सार्वजनिक बांधकाम विभाग मंत्रालय (खुद्द) येथील अपर मुख्य सचिव व सचिव (रस्ते) यांचेकरीता २ नवीन वाहने खरेदी करण्यास मंजुरी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन निर्णय क्र. व्हिसिएल-२०१५/प्र.क्र.०१/यं.बां.सा.**

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक - २५ मार्च, २०१५.

**वाचा-** १) अधीक्षक अभियंता(यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, कोकण भवन, नवी मुंबई यांचे कडील पत्र क्रमांक सा.बा.(यां.)/तां-२/धा.क्र.०१/६३/२०१५, दि. १५/०१/२०१५.

२) वित्त विभाग शासन निर्णय क्र. वाहन-२०१४/प्र.क्रं.९/१४/विनियम, दि. ८/०५/२०१४.

३) सामान्य प्रशासन विभागाचे अ.शा. पत्र क्र. एईओ १११५/१०/२०१५/दहा, दि.१/०१/२०१५.

**प्रस्तावना -**

सार्वजनिक बांधकाम विभागात सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्रमांक ३ च्या अ.शा. पत्रान्वये अपर मुख्य सचिव हे नवीन पद निर्माण करण्यात आले आहे. त्यांचेकरीता नवीन वाहन तसेच, सचिव (रस्ते) यांचे मुळ वाहन क्र एम.एच ०१ व्ही ३८८ हे निर्लेखित करण्यात आले असल्याने त्यांचे कार्यालयीन वापराकरीता त्या निर्लेखित वाहनाच्या बदली नवीन वाहन खरेदी करण्याचे प्रस्तावित केले आहे. तद्रुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभाग (खुद्द) येथे २ नवीन वाहने खरेदी करण्याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय -**

सार्वजनिक बांधकाम विभाग (खुद्द) व त्याच्या अधिपत्याखालील कार्यालयांचा एकत्रित वाहन आढावा नस्ती क्र. व्हीसीएल-२००९/प्र.क्र.९२/०९/यं.बां.सा. ही नस्ती सद्य:स्थितीत प्रलंबित आहे. यास्तव वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक २ नुसार वाहन आढावा झालेला नसल्याने उपरोक्त दोन्ही वाहनांच्या खरेदीकरीता राज्यस्तरीय वाहन आढावा समितीची मान्यता घेण्यात आलेली आहे.

२. सार्वजनिक बांधकाम विभाग मंत्रालय (खुद्द) येथे मा. अपर मुख्य सचिव (सा.बां. विभाग) यांचेकरीता नवीन वाहन व मा. सचिव (रस्ते), सा.बां. विभाग यांचे वापराकरीता निर्लेखित वाहन क्र एम.एच ०१ व्ही ३८८ बदल्यात नवीन वाहन खरेदी करण्यास शासनाच्या प्रचलित नियमांचे पालन करुन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदरहू वाहन खरेदीस खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

- निर्लेखित वाहनाच्या बदली त्याच प्रकारचे वाहन खरेदी करण्यात यावे. वाहन निर्लेखित झाल्यानंतर त्या वाहनाचा पुन्हा वापर करण्यात येऊ नये.
- वाहन चालकाचे पद मंजूर/उपलब्ध असणे आवश्यक आहे. कोणत्याही परिस्थितीत नवीन वाहन चालकांची पदे निर्माण करण्यात येऊ नयेत.
- सदर नवीन वाहने खरेदी शासन मान्यता प्राप्त उत्पादक कंपनीच्या प्रचलीत दरपत्रकानुसार करण्यात यावी.

- नवीन वाहने खरेदी करताना संदर्भ क्रमांक २ च्या वित्त विभागाच्या शासन निर्णयाचे कटाक्षाने पालन करण्यात यावे.

४. याबाबत होणारा खर्च सदरचा खर्च मागणी क्र.एच-६, २०५९ सार्वजनिक बांधकामे, ८०-सर्वसाधारण, ०५२-यंत्रसामुग्री व साधनसामुग्री, राज्यक्षेत्र (योजनेत्तर)- (००) (०१) दुरुस्त्या व वाहन (संगणक सांकेताक २०५९ २११६) ५१,मोटार वाहने या लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा व सन २०१४-१५ या वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. उपरोक्त नमूद २ नवीन कारच्या खरेदीकरीता रु १९,८४,०००/- (रुपये एकोणवीस लक्ष चौ-याएंशी हजार फक्त) इतका निधी अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई यांचेकडे सुपुर्द करण्यात यावा. सदर वाहन खरेदीची प्रक्रिया अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, कोकण भवन, नवी मुंबई यांच्या मान्यतेने करावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १०१/०५/विनियम, दि.१८/०२/२०१५ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनूसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५०३२५१६३५५९५०१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DEBADWAR ULHAS PRALADRAO

Digitally signed by DEBADWAR ULHAS PRALADRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PWD,CID - 916969, postalCode=400032, st=Maharashtra, cn=DEBADWAR ULHAS PRALADRAO
Date: 2015.03.25 16:51:28 +05'30'

**( यु.पी. देबडवार )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई, (दोन प्रती).
४. स्वीय सहाय्यक अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. स्वीय सहाय्यक, सचिव(रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

६. स्वीय सहाय्यक, आंतर वित्तिय सल्लागार व उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अधीक्षक अभियंता(यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
८. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई
९. वित्त विभाग (विनियम), मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यासन अधिकारी, अर्थ-३, सार्वजनिक बांधकाम विभाग. मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती, यंबांसा.